**राजुरा येथील मालगुजारी तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन व संरक्षण करण्यासाठी राबविण्यात येणा-या प्रकल्पातील कामांसाठी निधी मुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२००७/प्र.क्र.६९/तां.क.३**
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : २३ मार्च, २०१७**

**वाचा -**

१) पर्यावरण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय,दिनांक: ११ मार्च, २०१३, दिनांक २८ मार्च,२०१३ व दिनांक ८ जानेवारी,२०१६.
२) दिनांक २९ जुलै,२०१५ रोजीच्या सुकाणू समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) मुख्याधिकारी, नगरपरिषद, राजूरा यांचे पत्र क्र.जावक क्र.नपरा/तां.शाखा/टे-३/निधी/३९०/२०१७, दिनांक १.३.२०१७.

**प्रस्तावना -**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत राजूरा नगरपरिषद, जिल्हा चंद्रपूर यांचेमार्फत प्राप्त माजी मालगुजारी येथील तलावाच्या पर्यावरणीय संवर्धन प्रस्तावास संदर्भाधीन दिनांक २८ मार्च, २०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.उपरोक्त तलावाच्या संवर्धनाच्या अनुषंगाने मंजूर करण्यात आलेली कामे राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २८ मार्च, २०१३ रोजीच्या व दिनांक ८ जानेवारी, २०१६ च्या शासन निर्णयाव्दारे अनुक्रमे एकूण रुपये ११५.०० लक्ष व रुपये ७३.७९ लक्ष मिळून एकूण रुपये १८८.७९ लक्ष (रुपये एक कोटी अठ्ठयाऐंशी लक्ष एकोणऐंशी फक्त) एवढी रक्कम मुक्त करण्यात आली होती. सदर रक्कमेचा पूर्णपणे विनियोग झाल्याबाबत संबंधितांनी उपयोगिता प्रमाणपत्र, पाण्याचा गुणवत्ता अहवाल, कामाचा भौतिक व वित्तीय प्रगती अहवाल राजुरा नगरपरिषदेने सादर केले आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने राजुरा नगरपरिषद हद्दीतील माजी मालगुजारी तलावाच्या पर्यावरण संवधनासाठी झालेल्या खर्चास उर्वरित निधी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. राज्य योजनेखाली राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत राजुरा नगरपरिषदेमार्फत सादर माजी मालगुजारी तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २८ मार्च, २०१३ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे राज्य हिश्श्यापोटी एकूण रुपये ७,०२,३७,२३८/- (रुपये सात कोटी दोन लक्ष सदतीस हजार दोनशे अडतीस फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. मंजूर रक्कमेपैकी आतापर्यन्त राजुरा नगरपरिषदेस रक्कम रुपये १८८.७९ लक्ष (रुपये एक कोटी अठ्ठयाऐंशी लक्ष एकोणऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यात आला असून आता या शासन निर्णयान्वये राजुरा नगरपरिषदेस माजी मालगुजारी तलावाच्या संवर्धनासाठी उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता एकूण रुपये ६०.०० लक्ष ( अक्षरी रुपये साठ लक्ष फक्त ) इतक्या रकमेस मान्यता देण्यात येत आहे

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत राजुरा नगरपरिषद हददीतील माजी मालगुजारी तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य हिश्श्यापोटी देय एकूण रुपये ७,०२,३७,२३८/- (रुपये सात कोटी दोन लक्ष सदतीस हजार दोनशे अडतीस फक्त) एवढया रक्कमेपैकी या शासन निर्णयाव्दारे पुढील हप्ता रुपये ६०.०० लक्ष (रुपये साठ लक्ष फक्त ) इतकी रक्कम खर्च करण्यास मुख्याधिकारी, राजुरा नगरपरिषद यांना या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी मुख्याधिकारी, राजुरा नगरपरिषद, राजुरा ( Chief Officer, Rajura Municipal Council, Chandrapur) यांचे नांवे रुपये ६०.०० लक्ष (रुपये साठ लक्ष फक्त ) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. राजुरा नगरपरिषदेला अदा करावयाची रक्कम रुपये ६०.०० लक्ष (रुपये साठ लक्ष फक्त) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्याधिकारी, राजुरा नगररिषद यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. वि. गो. कडू, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. म.बा. हजारी, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मुख्याधिकारी, राजुरा नगरपरिषद यांना रुपये ६०.०० लक्ष (रुपये साठ लक्ष फक्त ) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाव्दारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२),पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ वर्षात अर्थसंकल्पित रु.८६०.०० लक्षच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.१६ मधील परिच्छेद क्रमांक ७(क) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, उपरोक्त परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत असून अनुक्रमांक १,२,५,६,७,८ करिता वित्त विभाग व नियोजन विभाग यांच्या मंजुरीची आवश्यकता नाही

७. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५०/१४६१, दिनांक १३.३.२०१३ अन्वये तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्रक्र.८९/अर्थ-३, दिनांक २७ एप्रिल, २०१६ मधील परि. क्र.७(क) अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक २०.४.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील प्रत्येक अटीची तसेच परिशिष्टातील अनु.क्र.३ व ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे.

८. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ अन्वये खालील बाबींची पुर्तता होत आहे.

१. विभागास प्रदान वित्तीय अधिकार, सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आलेली आहे.

२. मालगुजारी तलावाच्या संवर्धनासाठी एकूण मंजूर रुपये ७,८०,४१,३७६/- (रुपये सात कोटी ऐंशी लक्ष एकेचाळीस हजार तीनशे शहात्तर फक्त) पैकी राज्यशासनामार्फत उपलब्ध करुन दिलेल्या ७,०२,३७,२३८/- (रुपये सात कोटी दोन लक्ष सदतीस हजार दोनशे अडतीस फक्त) निधीपैकी रुपये १८८.७९ लक्ष एवढा निधी वितरित करण्यात आला. वितरित केलेला पूर्ण निधी खर्च झाला असून निधीचा पुढील हप्ता रुपये रुपये ६०.०० लक्ष (रुपये साठ लक्ष फक्त) इतका निधी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

३. मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२), पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही

५. राजुरा नगरपरिषदेकडून पर्यावरण विभागाकडे कोणतेही येणे बाकी नाही.

६. तसेच परिच्छेदातील ६, ७, ८, ९ या बाबी लागू नाहीत.

९ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२९१६०२३०९५०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Vinayak G Kadoo

Digitally signed by Vinayak G Kadoo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=92d45ee51f2a551db32f5e6056b22f84b99bcf4c38f0bae7d3cdb71a716490ad, cn=Vinayak G Kadoo
Date: 2017.03.29 16:05:19 +05'30'

**(वि. गो. कडू)**
**कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. मुख्याधिकारी, राजुरा नगरपरिषद,चंद्रपूर
५. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, चंदपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
९. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
११. प्रधानसचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१४. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती.